# लता मंगेशकरांची गैरफिल्मी गाणी

२८ सप्टेंबर २००९ रोजी श्रीमती लता मंगेशकर ऐंशी वर्षे पूर्ण करत आहेत. पैकी पन्नास वर्षे त्या पार्श्वगायनाच्या क्षेत्रात आहेत. १९८९ साली साठाव्या वाढदिवसाच्या सुमारास त्यांच्या हिंदी चित्रपट गीतांचा अभ्यासपूर्ण गीतकोष तयार झाला. काही अभ्यासक व संग्राहकांनी त्यांच्या इतर भाषांतल्या गाण्यांचे कोष तयार करायचे संकल्प सोडले. त्यापैकी बंगाली गीतांचा कोष प्रसिद्ध झाला असून गुजराथीतलं काम होत आलं आहे असं समजतं. हिंदीनंतर त्यांची सर्वात जास्त गाणी मराठीतच असावीत असा अंदाज आहे. पण सर्वच भाषांतल्या गैरफिल्मी गाण्यांचा एकत्र आढावा कुणी घेतलेला दिसत नाही. त्याची काही सुरूवात म्हणून दक्षिण मुंबईतल्या टाटा थिएटर परिसरातल्या 'वाडिया लायब्ररी ऑफ म्युझिक' मध्ये शोध घेतला. १९७० पासूनची वर्तमानपत्रं, नियतकालिकांमधल्या कात्रणांचे संग्रह तिथं पहावयास मिळाले. लताजींच्या नावाच्या चार बॉक्स फाइल्स आढळल्या. तसेच काही रेकॉर्ड कॅटलॉग पण सापडले.

त्यांची हिंदी चित्रपटातल्या पार्श्वगायनाची सुरूवात १९४७ साली झाली व १९४८ मध्येच पहिली गैरफिल्मी गाणी मुद्रित झाली ती एका नृत्यनाटया(बॅले)साठी. त्याचं नाव होतं 'भगवान गौतम बुद्ध'. प्रो. शांतीकुमार चित्रे हयाचे निर्माते होते व संगीतकार होते श्री. एच. एन. नंदी. त्यात लता मंगेशकरांची सहा गाणी असून ती विंगेतल्या ग्रामोफोनवर वाजवीत असत. त्यावर मंचावरची पात्रं मूकअभिनय करत असत. नायकाची म्हणजे 'गौतम बुद्धा'ची भूमिका नलिन शहांनी केली होती. ते पुढं सिनेपत्रकार म्हणून गाजले. नृत्यनाटयाचे थोडेच प्रयोग झाले. मात्र कलाकारांना ध्वनिमुद्रिकांचे संच भेट देण्यात आले. काळाच्या ओघात त्यातले काही चोरबाजारातून संग्राहकांच्या खजिन्यांत येऊन विसावले. ही सगळीच गाणी फार गोड आहेत.

लवकरच लताजी हिंदी चित्रपट गीतांच्या ध्वनिमुद्रणांत अधिकाधिक व्यस्त होत गेल्या. मात्र मराठी साहित्य, काव्य व गाण्याचा अभ्यास व व्यासंग सतत चालूच होता. १९५२ च्या सुमारास दत्ता डावजेकरांनी काही मराठी गाणी लिहिली. ती लताजींकडून एच. एम. व्ही. मध्ये ध्वनिमुद्रित करवून घेतली. दिवाळीच्या मुहूर्तावर प्रकाशित झालेली दोन गाणी होती – 'आली दिवाळी मंगलदायी, आनंद झाला घरोघरी', 'भाऊबीजेला आला माझा भाऊ घरी'. ग्रामोफोन व रेडिओच्या माध्यमातून ही गाणी घराघरात जाऊन पोहोचली. त्या काळात भावगीतं गाण्यात पुरूषच आघाडीवर असत. स्त्रियांची

गाणी त्यांनीच गायची एक नवीनच लाट मग आली. 'तुज स्वप्नी पाहिले रे गोपाळा' हे डावजेकरांचं आणखी एक गाणं गाजलं. १९५२ च्या दिवाळीमध्येच गीतकार पी. सावळाराम व संगीतकार वसंत प्रभूंनी लताजींच्या आवाजातली चार अवीट गोडीची गाणी दिली – 'श्रीरामा घनश्यामा', 'रघुनंदन आले', 'गंगा जमुना डोळयात उभ्या कां' व 'तुझे डोळे पाण्याने भरले'. हया तिघांनी मिळून १९५८ पर्यंत तीसेक गाणी केली व ती आजही मराठी मनांच्या भावविश्वाचा एक भाग बनून राहिली आहेत. गीताची पहिली ओळ जरी वाचली तरी सगळं गाणंच आपोआप मनात वाजायला लागतं. उदा. 'कल्पवृक्ष कन्येसाठी' 'मुली तू आलीस अपुल्या घरी' 'घरात हसरे तारे असता' 'हंसले ग बाई हसले' 'प्रेम तुझ्यावर करते मी' 'घट डोईवर घट कमरेवर' 'विठ्ठल तो आला आला' 'सप्तपदी मी रोज चालते' 'हरवले ते गवसले कां'. रमेश अणावकर व द. वि. केसकर हयांची गीतंही मुद्रित झाली. माधव ज्युलियनांची 'प्रेमस्वरूप आई' ही कविता व भा. रा. तांबे हयांच्या कवितांच्या ध्वनिमुद्रिकाही खूप गाजल्या – 'निजल्या तान्हयावरी' 'कळा ज्या लागल्या जीवा' 'मधुघटचि रिकामे पडती' ' नववधू प्रिया मी बावरते' 'ते दूध तुझ्या त्या घटातले' व 'जन पळभर म्हणतील हाय हाय'. बी कवींची 'चाफा बोलेना' कविता १९५८ च्या जानेवारीत वितरीत झाली. ही सगळी गाणी कोलंबिया कंपनीच्या निळया रंगाच्या लेबलवर जी. ई. सीरीज मधली आहेत. मराठी मनांवरती त्याची 'स्वरमोहिनी' अजूनही टिकून आहे. त्याचं कारण लताजींनी ही गाणी फार समरसून गायलेली आहेत. (हयाच मालिकेत सौ. आशा भोसले व सौ. माणिक वर्मा हयांची प्रत्येकी तीसहून अधिक गाणी १९६0 पर्यंत प्रकाशित झाली होती. )

१९५२ ते १९५८ हा सहा वर्षाचा कालखंड वसंत प्रभूंचं संगीत व लताजींच्या गोड आवाजानं व्यापलेला होता. ते सूर व संगीत आसमंतात असतांनाच १९५४ मध्ये लताजींच्या आवाजात दोन हिंदी भजनं मुद्रित झाली. सूरदासांचं 'मैं नही माखन खायो' व कबीरांचं 'दिल धरवे सो एक न्यारा है'. त्यांचं संगीत वसंत प्रभूंचं होतं. १९५५ च्या फेब्रुवारी–मार्च कोलंबिया कॅटलॉगमध्ये 'नवीन हिंदी रेकॉर्डस' अशी जाहिरात लता मंगेशकरांच्या छायाचित्रासह प्रकाशित झाली आहे. त्यात 'ही सुप्रसिद्ध भजनं लता मंगेशकर यांनी भक्तिपूर्वक गायिली असल्यामुळे ती खात्रीने तुम्हाला आवडतील' असं म्हटलं आहे. १९५७ मध्ये सूरदासांचं 'निसदिन बरसत नैन' व मीराबाईचं 'बरसे बुँदिया सावनकी' अशी दोन भजनं वितरित झाली. त्याचं संगीत हृदयनाथ मंगेशकरांचं होतं. विसाव्या वर्षी त्यांनी या गाण्यांनी संगीतरचना करायला सुरूवात केली. त्या पहिल्या संगीतात वसंत प्रभूंचा प्रभाव जाणवतो. पुढे त्यांनी आपली स्वतंत्र शैली निर्माण करून ऊत्तमोत्तम हिंदी व मराठी गाणी दिली. त्यात

मीराबाईंची भजनं, गालिबच्या रचना आहेत. आरती प्रभू, शांता शेळके, सुरेश भट, राजा बढे, भा. रा. तांबे, वि. दा. सावरकर, बालकवी, ना. धों. महानोर व ग्रेस यांच्या मराठी कवितांना सुंदर चाली लावून त्यांनी लतादीदींकडून गाऊन घेतल्या. 'गणपतीची आरती', 'ज्ञानेश्वरी', 'भगवदगीता', 'शिवकल्याण राजा', 'राम रतन धन पायो' (गांधीप्रिय भजने), 'स्वर-सुमनांजली' व 'माझ्या आजोळची गाणी' अशा सुरेख ध्वनिमुद्रिका त्यांनी दिल्या आहेत.

**बाबूजी सुधीर फडके हयांच्या संगीतात त्यांनी गायलेलं चित्रपटाबाहेरचं एकमेव गाणं म्हणजे गीत रामायणातलं - 'मज सांग लक्ष्मणा जाऊ कुठे'**. लताजींच्या गैरफिल्मी हिंदी गाण्यांमध्ये १९६१ साली फैयाज शौकत यांच्या संगीतातल्या मिर्झा गालिबांच्या दोन रचना लताजींनी गायल्या आहेत. १९६३ मध्ये 'ए मेरे वतनके लोगो' हे कवी प्रदीप यांनी रचलेलं व सी. रामचंद्र यांचं संगीत लाभलेलं गीत गाजलं. ते पुढं एच. एम. व्ही. च्या विशेष लेबलवर वितरित झालं. १९६४ साली ललिता शास्त्रींच्या दोन रचना चित्रगुप्त यांच्या संगीतातल्या आहेत. १९७१ मध्ये पं. नरेंद्र शर्मा व उद्धव कुमार यांची प्रत्येकी एक रचना संगीतकार जयदेव यांनी लताजींकडून गाऊन घेतली. १९७३ साली शकील बदायुनी व खलिश दहलवी यांची एकेक रचना व अभिलाष यांच्या दोन रचना के. महावीर यांनी स्वरबद्ध केल्या. आज ही गाणी फारशी ऐकायला मिळत नाहीत.

१९६0 ते ७0 मध्ये लताजी पार्श्वगायनात आकंठ बुडालेल्या होत्या. तरीही हया गाण्यांसाठी त्यांनी वेळ काढला हे विशेष. याचं कारण त्यांचं काव्य व साहित्यावरचं मनापासूनचं प्रेम व दांडगा व्यासंग. अगदी लहानपणीच मा. विनायकांनी त्यांना भा. रा. तांब्यांच्या कवितांचं पुस्तक दिलं होतं. 'तिन्ही सांजा सखे मिळाल्या' व 'कशी काळ नागिणी, सखे ग वैरीण झाली नदी' या कविता तर त्यांनी आधी रेडिओवर गायिल्या व नंतर त्याच्या ध्वनिमुद्रिका बनल्या. कुसुमाग्रजांचं 'जीर्ण पाचोळा पडे तो ऊदास' कविताही याच सुमारास मुद्रित झाली. १९७0 च्या आसपास मंगेश पाडगावकरांच्या कविता, श्रीनिवास खळे व लताजींच्या आवाजातून अवीट गोडीची भावगीतं या रूपानं वितरीत झाल्या. 'नीज माझ्या नंदलाला' 'श्रावणात घन निळा बरसला' 'जाहल्या काही चुका' व 'भावनांचा तू भुकेला रे मुरारी'. 'अभंग तुकयाचे' ही एल. पी. याच काळातली. १९८५ च्या सुमारास खळेसाहेबांनी 'राम श्याम गुण गान' या एल. पी. रेकॉर्डमध्ये लताजी व पं. भीमसेन जोशी हयांच्या एकत्र गाण्याचा अभिनव प्रयोग केला. यातल्या रचना पं. नरेंद्र शर्मांच्या आहेत. हा कालखंड

दीर्घ काळ वाजू शकणा-या ध्वनिमुद्रिकांचा असल्यानं तीनच मिनिटांत गायचं बंधन गळून पडलं होतं. तरीही कुठचीच गाणी पाच सहा मिनिटांपेक्षा जास्त वेळ वाजणारी नाहीत.

हिंदी व मराठी बरोबर इतर भारतीय भाषांमध्येपण मुद्रणं चालूच होती. **अगदी सिंहली भाषेतही त्यांनी काही गाणी म्हटली आहेत.** बंगाली मध्ये शंभराहून अधिक आधूनिक गीतं व पूजा गीतं त्यांनी गायिली असून पुष्कळ रचना व संगीत हे सलिल चौधरींचं आहे. शीख धर्मगुरूंचे 'शबद' एका एल.पी.वरती असून त्याचं संगीत विख्यात सिंग बंधूंचं आहे. १९७0 च्या आसपास 'चालां वाही देस - मीरा भजनं' व गालिब जन्मशताब्दीनिमित्तानं 'लता सिंगस गालिब' या दोन एल.पी. रेकॉर्डस प्रकाशित झाल्या. त्यांचं संगीत हृदयनाथ मंगेशकरांचं आहे. 'सुमिरण (स्तोत्रे)', 'सर्वमंगल गणेश', 'जय राम (अनुप जलोटासह)', 'एक राधा, एक मीरा', 'जगराता - भाग १ व २ (देवी अंबेची गाणी), 'मीरा, सूरदास, कबीर', 'अंतर्नाद (वाजपेयींच्या कविता)', व 'अष्टविनायक गीते' तर आता सी.डी. वर उपलब्ध आहेत. **रंगीत दूरदर्शनच्या जमान्यात 'महाश्वेता' मालिकेचं शीर्षक गीत 'भय इथले संपत नाही' व 'मेरी आवाज सुनो' चं शीर्षक गीत त्यांच्या आवाजातलं आहे.**

१९९७ मध्ये भारताच्या स्वातंत्रयाला पन्नास वर्षे झाली. त्यानिमित्तानं लताजींनी काही नवी व बरीचशी जुनी पण गाजलेली देशभक्तिची गाणी पुन्हा एकदा मुदित केली. त्यात आनंद मठ मधलं 'वंदे मातरम' व 'ए मेरे वतनके लोगो' ही होतीच. पण ए.आर. रहमान च्या 'माँ तुझे सलाम' व इतर गाण्यांतून त्या व्हिडिओमध्ये पण आल्या. त्याची सुरूवात १९८८ च्या भारतबाला च्या 'मिले सुर मेरा तुम्हारा' व्हिडिओमधून झाली व अगदी अलिकडे राष्ट्रगीत तुकडया तुकडयानं व हसत हसत गाण्याच्या महान प्रयोगातही त्या सामील झालेल्या पहावयास मिळाल्या. ग्रेस यांच्या कवितांवरील ध्वनिचित्रफीतीतही त्या गाताना दिसतात.

ही गैरफिल्मी गाणी गाण्याची प्रेरणा लताजींना कुठून मिळाली असावी? त्यांनीच एके ठिकाणी याचं ऊत्तर दिलं आहे. त्यांचे वडिल मा. दीनानाथ मंगेशकर रोज झोपण्यापूर्वी ज्ञानेश्वरी, दासबोध किंवा भगवदगीतेतलं काहीना काही मोठयानं वाचत असत. वीर वामनराव जोशी हयांचं 'रणदुंदुभि' व वि. दा. सावरकारांचं 'संन्यस्त खडग' ही संगीत नाटकं त्यांनी मराठी रंगभूमीवर दिमाखात आणली व त्यातली गाणी खूप गाजली. धर्म व देशप्रेमाचे हे संस्कारच सुप्तपणे त्यांच्या मनात असावेत.

हिंदी, मराठी, बंगाली, गुजराथी व इतर भारतीय भाषांमधली मिळून लताजींनी तीनशेच्या आसपास गाणी गायली असावीत असा अंदाज आहे. या गाण्यांमध्ये एकही नाटयगीत मात्र आढळत नाही. ते राहूनच गेलं असावं. त्यांची सुबक व शास्त्रशुद्ध सूची बनवण्याच्या कामात सर्वांनाच आमंत्रण आहे. पाच हजारांहून अधिक हिंदी चित्रपटगीतांच्या तुलनेत तीनशे ही संख्या खूप कमी वाटणारी आहे. पण यातल्या गाण्यांतूनच लताजींचा आवाज पुढच्या पिढयान पिढया ऐकणार आहेत. जोवर भारतीयांच्या मनात धर्मप्रेम व देशप्रेम जागं आहे तोवर गणेशोत्सवात, शिवजयंतीला, स्वातंत्र्य व प्रजासत्ताकदिनी त्यांची गाणी वाजणार आहेतच. कबीर, मीरा, व सूरदासांच्या भजनांतून, गालिबच्या गझलांतून, ज्ञानदेवांच्या पसायदानातून व तुकारामांच्या अभंगातून त्यांचा आवाज मनामनांमध्ये कायमचा साठवून ठेवला जाणार आहे.

डॉ. सुरेश चांदवणकर

१५ सप्टेंबर २००९

Chandvankar.suresh@gmail.com